“नाशिक शहर येथे NIC ई चलान पायलट प्रकल्प”
सुरु करण्यासाठी रु.५७ लाख इतक्या अतिरिक्त
निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-०२२३/प्र.क्र.४९/पोल-३**
गृह विभाग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ जुलै, २०२३.

वाचा :-

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१०९८/प्र.क्र.२१२/९८/३९, दि.५.१०.२००१, दि. ५.१०.२००२, दि. ५.११.२००२, दि. ५.८.२००५.
२. शासन निर्णय, गृह विभाग क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.५.२०१५.
३. शासन निर्णय, गृह विभाग क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३(अ), दि.२.६.२०१६, दि.२२.३.२०१७, दि. २०.७.२०१७.
४. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१०.११.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१७/प्र.क्र.२/पोल-३, दि.५.६.२०१७, दि. ३.२.२०१८, व दि. १२.११.२०१८.
६. महाराष्ट्र शासनाच्या वतीने अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) आणि मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांचे दरम्यान दि. ११.१२.२०१८ रोजी झालेला करार.
७. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) क्र. ३२८४/२०१८, दि. ११.१२.२०१८ चे कार्यादेश.
८. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २०५१/२०२२, दि. १०.६.२०२२.
९. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी-३६१७/प्र.क्र.२/भाग-२/पोल-३, दि.२३.९.२०२२,
१०. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अपोमसं (वा)/४४/वाचक/ई-चलान/५५३/२०२३, दि. १३.२.२०२३
११. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अपोमसं (वा)/४४/वाचक/ई-चलान/७६५/२०२३, दि. २१.२.२०२३
१२. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि. १५.११.२०१७, दि. १३.५.२०१९, दि. १४.८.२०१९, दि. १३.७.२०२२ व दि. २०.४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

२. शासन निर्णय, गृह विभाग दि.२.६.२०१६ अन्वये अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची पुनर्रचना करण्यात आली. तसेच शासन निर्णय, गृह विभाग दि.२२.३.२०१७ अन्वये उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षामध्ये गृह विभागातील सर्व तंत्रज्ञान विषयक प्रकल्पांचा समावेश करण्यात आला आहे.

३. राज्यातील वाहनांची संख्या, दिवसेंदिवस वाढत असून त्यामुळे वाहतूक कोंडी व इतर समस्या निर्माण होत आहेत. वाहतूक नियमांचे उल्लंघन करणाऱ्यांकडून दंड वसूली दरम्यान वाहतूक पोलीस

कर्मचारी/अधिकारी यांना अडचणींना सामोरे जावे लागत आहे. त्यामुळे वाहतूक समस्यांवर अंकुश ठेवणे व कसूरदार व्यक्तींवर प्रभावी तथा पारदर्शकपणे कारवाई करण्यासाठी राज्यात “ई-चलान” प्रकल्प राबविण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु.५९,१२,३१,५०७/- इतक्या निधीच्या खर्चास शासन निर्णय, गृह विभाग दि.३.२.२०१८ नुसार मान्यता देण्यात आली. तसेच शासन निर्णय, गृह विभाग दि.३.२.२०१८ अन्वये ई-चलान प्रकल्पासाठी अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) गठीत करण्यात आली आहे. सदर समितीमार्फत प्रकल्पाची अंमलबजावणी व देखरेख करण्यात येत आहे.

४. ई-चलान प्रकल्पाच्या निविदा प्रक्रीयेतून पात्र ठरलेल्या पुरवठादाराच्या निवडीस उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीने दि.७.९.२०१८ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र शासनाच्या वतीने अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) आणि मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांच्यात दि.११.१२.२०१८ रोजी पाच वर्षांचा करार करण्यात आला आहे. तसेच अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) यांचे पत्र क्र.३२८४/२०१८, दि. ११.१२.२०१८ अन्वये मे. टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंट्स इंडिया लिमिटेड यांना कार्यादेश देण्यात आले आहे. ई-चलान प्रकल्प कराराच्या तरतूदीप्रमाणे पुरवठादार मे.टेलिकम्युनिकेशन्स कन्सल्टंटस् इंडिया लिमिटेड यांना प्रत्येक ई-चलान व्यवहाराकरिता याप्रमाणे प्रत्येक तिमाहीकरिता रक्कम देय आहे.

५. अपर पोलीस महासंचालक, (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दि. १०.६.२०२२ रोजीच्या पत्रान्वये वन स्टेट वन ई चलान प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे (PIC) इतिवृत्त सादर केले होते. त्यानुसार अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती (HPC) च्या दि. १३.७.२०२२ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार शासन निर्णय, गृह विभाग २३.९.२०२२ अन्वये ई-चलान प्रकल्पाच्या कार्यान्वयन तसेच देखभाल व दुरुस्तीसाठी (Operation and Maintenance) येणाऱ्या ९० कोटी इतक्या सुधारीत खर्चास मान्यता देण्यात आली. त्यानुसार ई-चलान प्रकल्पाच्या एकूण १४९ कोटी इतक्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली.

६. दि.२७.५.२०२२ रोजी अपर मुख्य सचिव, गृह यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये नाशिक शहर येथे NIC ई चलान पायलट प्रोजेक्ट सुरु करण्याबाबत सूचित करण्यात आले होते. सदर सुचनेनुसार नाशिक शहर येथे NIC ई चलान पायलट प्रोजेक्ट करीताचा सविस्तर प्रस्ताव अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या दि. १३.२.२०२३ व दि.२१.२.२०२३ च्या पत्रान्वये सादर केला.

७. त्यानुषंगाने अ.मु.स.(गृह) यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या दि.२०.४.२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत सदरहू विषयावर चर्चा झाली व त्यामध्ये खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

नाशिक शहर येथे NIC ई चलान पायलट प्रकल्प सुरु करण्यासाठीच्या रु. ५७ लाख इतक्या अतिरिक्त खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतच्या प्रस्तावास सहमती देण्यात आली. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

अ.मु.स. (गृह) यांचे अध्यक्षतेखालील दिनांक २०.४.२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार “नाशिक शहर येथे NIC ई चलान पायलट प्रकल्प” सुरु करण्यासाठी रु. ५७ लाख इतक्या अतिरिक्त निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रकल्पाची अंमलबजावणी व देखरेख करण्याची कार्यवाही अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत करण्यात येत आहे. सदर समितीने प्रकल्पाच्या कामकाजाचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

सदर प्रकल्पासाठी येणारा खर्च हा “मागणी क्र. १, २०५५-पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री,” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि. २०.४.२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०४१३५७३७५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.07.04 13:58:41 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स., महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), पोलीस आयुक्त कार्यालय, मुंबई.
१२. संचालक (माहिती तंत्रज्ञान), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१३. महासंचालक, राष्ट्रीय माहिती केंद्र (NIC), गणेशखिंड रोड, आय.सी.एस.कॉलनी, अशोकनगर, पुणे-४११००७.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१७. वित्त विभाग (व्यय-७ / वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई.
१८. सहसचिव (पोल-१४ / अर्थसंकल्प शाखा) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती पोल-३.